मंत्रालयातील स्वच्छतागृहांचे व्यवस्थापन व आधुनिकीकरणाचे संनियंत्रण करण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण -२०११/प्र.क्र. ८५/पापु २१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ६ ऑगष्ट, २०११**

**संदर्भ :- शासन निर्णय क्र. सुनिअ-२०१०/प्र.क्र. १३२/पापु-२२, दिनांक १९ जून, २०१०**

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त महाराष्ट्र राज्य निर्मल करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. राज्यात स्वच्छता सेवांच्या सार्वत्रिकरणासाठी नागरी व ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावयाच्या उपाययोजनासह, राज्य शासनाच्या विविध शासकीय/निमशासकीय कार्यालयामध्ये सुध्दा स्वच्छतागृहांची पर्याप्त उपलब्धता असावी यासाठी सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना सूचना देण्यात आलेल्या आहेत. राज्य शासनाचे मुख्यालय असलेल्या मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवन व बॅरेक्समध्ये सुध्दा स्वच्छतागृहांची पर्याप्त उपलब्धता व त्यांची नीट देखभाल होणे अत्यंत आवश्यक आहे. राज्य शासनाच्या या मुख्यालयास ग्रामीण, नागरी भागातील नागरीक, इतर राज्य व देश इत्यादींचे प्रतिनिधी/अधिकारी भेट देत असतात. अशा परिस्थितीत, राज्य शासनाच्या मुख्यालयातील स्वच्छतागृहे ही नीटनेटकी, पर्याप्त प्रमाणात आधुनिक पध्दतीची असणे तसेच त्यांची देखभाल नियमित होणे आवश्यक आहे. सद्या मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवन व बॅरेक्स मधील महिला व पुरुष स्वच्छतागृहांमध्ये सुधारणा करणे आवश्यक झालेले आहे. या सर्व बाबींचा विचार करुन मंत्रालय, नवीन प्रशासन भवन व बॅरेक्स येथील महिला तसेच पुरुष स्वच्छतागृहांचे अत्याधुनिकीकरण करणे, आवश्यक साधनांची उपलब्धता ठेवणे, स्वच्छतेत सातत्य राखणे, मलनि:सारण व्यवस्था, परिसर स्वच्छतेसाठी घनकच-याचे व्यवस्थापन करणे इ.बाबींची प्रत्यक्ष अंमलबजावणी व व्यवस्थापन करण्यासाठी मंत्रालय स्तरावर समिती स्थापन करण्याची बाब शासनास विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. उपरोक्त परिस्थिती विचारात घेऊन मंत्रालयातील मुख्य इमारत, विस्तार इमारत, नवीन प्रशासकीय भवन व बॅरेक्स येथे महिला व पुरुषांसाठी पर्याप्त स्वच्छतागृहांचे बांधकाम, अस्तित्वातील स्वच्छतागृहांमध्ये सुधारणा करणे, स्वच्छतागृहांचे आधुनिकीकरण करणे, देखभाल व दुरुस्ती करणे, मलनि:सारण व घनकचरा व्यवस्थापनासाठी उपाययोजना व संनियंत्रणासाठी खालील प्रमाणे **"मंत्रालय स्वच्छता व्यवस्थापन व संनियंत्रण समिती"** गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | अध्यक्ष |
| २) | सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकाम) | सदस्य |
| ३) | सचिव, पर्यावरण विभाग | सदस्य |
| ४) | उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (आस्थापना) | सदस्य |
| ५) | उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (नागरी स्वच्छता) | सदस्य |
| ६) | सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (मुख्य सचिव कार्यालयातील-मुख्य सचिवांचे प्रतिनिधी म्हणून) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ७) | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (मंत्रालय स्वच्छता, देखभाल संबंधित) | सदस्य |
| ८) | उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (मंत्रालयातील स्वच्छता व Housekeeping संबंधात) | सदस्य सचिव |

३. मंत्रालय स्वच्छता व्यवस्थापन व संनियंत्रण समितीकडुन स्वच्छते संदर्भात खालील विषयांचे संनियंत्रण करण्यात येईल.

१. मंत्रालय, नवीन प्रशासन भवन, बॅरेक्स येथील स्वच्छतागृहांचा आढावा घेऊन पर्याप्त महिला व पुरुष स्वच्छतागृहे बांधण्यासाठी उपाययोजना सुचविणे.
२. महिला व पुरुष स्वच्छतागृहांची स्वच्छता व आवश्यक साहित्य पुरवठा.
३. महिला व पुरुष स्वच्छतागृहांचे अत्याधुनिकरण करणे.
४. उशिरापर्यंत थांबणा-या महिलांसाठी महिला स्वच्छतागृहांची स्वच्छता व सुरक्षा.
५. मंत्रालयातील मलनि:सारण व्यवस्थेचा आढावा घेऊन व्यवस्थापन सुचविणे.
६. मंत्रालयातील घनकचरा व्यवस्थापनासाठी प्रभावी उपाययोजना.

४. या समितीने मंत्रालय, नवीन प्रशासन भवन, बॅरेक्स येथे उपलब्ध असलेल्या स्वच्छता सुविधांबाबत तेथील अधिकारी/कर्मचा-यांकडुन प्रथम माहिती प्राप्त करुन उपलब्ध सुविधांचा आढावा घ्यावा. त्यासाठी, मंत्रालयातील (मुख्य इमारत व विस्तार इमारत, नवीन प्रशासन भवन, बॅरेक्स मधील) प्रत्येक मजल्यावरील प्रशासकीय विभागातील आस्थापना अवर सचिव/कक्ष अधिकारी- (एक पुरुष व एक स्त्री) यांनी त्या मजल्यावर महिला/पुरुष स्वच्छतागृहांची उपलब्धता, स्वच्छता, इत्यादी बाबत माहिती सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील प्रश्नावलीमध्ये भरुन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे पाठवावी. प्राप्त होणा-या प्रश्नावलीतील माहिती एकत्रित करुन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने सार्वजनिक बांधकाम विभागास पाठवून याबाबत त्वरित कार्यवाही करण्याबाबत कळविण्यात यावे. या प्रश्नावलीच्या आधारे सार्वजनिक बांधकाम विभागाने या इमारतींमध्ये पर्याप्त स्वच्छतागृहे बांधणे, आधुनिकीकरण करणे, देखभाल इत्यादींचा कृती आराखडा तयार करुन या राज्यस्तरीय समितीच्या अवलोकनार्थ सादर करावा. त्यानुसार मंत्रालय स्वच्छता व्यवस्थापन व संनियंत्रण समितीने त्याचा आढावा घेऊन प्रभावी व कालबध्द अंमलबजावणीसाठी सूचना देऊन सार्वजनिक बांधकाम विभागाद्वारे स्वच्छतेबाबत करावयाच्या कामाचे संनियंत्रण करावे.

५. मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवन व बॅरेक्स मधील स्वच्छतागृहाची देखभाल व दुरुस्ती नियमित आणि प्रभावीपणे होण्यासाठी **"विशेष तक्रार निवारण व्यवस्था "** सार्वजनिक बांधकाम विभागाने कार्यान्वीत करावी . महिला व पुरुष स्वच्छतागृहांमध्ये दररोज नियमितपणे पाणी ,द्रव साबण, कचराकुंडी उपलब्ध करणे तसेच स्वच्छतागृहांची दररोज नियमितपणे स्वच्छता होईल याबाबत विशेष दक्षता सार्वजनिक बांधकाम विभागाने घ्यावी. यासाठी मंत्रालय व नवीन प्रशासन भवन येथे तक्रार निवारण कक्ष स्थापन करुन तो नियमितपणे कार्यरत राहील याची दक्षता घ्यावी. महिला/पुरुष अधिकारी/कर्मचाऱ्यांस स्वच्छतेबाबतच्या तक्रारी या ऑनलाईन नोंदविता येवून त्यांचेवर कार्यवाही करण्याची यंत्रणासुध्दा सार्वजनिक बांधकाम विभागाने कार्यान्वित करावी.

६. मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवनातील उपहारगृहामध्ये मोठया प्रमाणावर कचरा निर्माण होत असतो. त्याची योग्य विल्हेवाट लावणे, सर्व भोजनगृह स्वच्छ व निटनिटके ठेवणे, भोजनगृहात द्रव्य साबणाची व्यवस्था इत्यादींबाबत काटेकोरपणे पूर्तता करण्याची दक्षता व्यवस्थापक, उपहारगृह यांनी घ्यावी.

७. वर नमूद बाबींचा नियमित आढावा " मंत्रालय स्वच्छता व्यवस्थापन व संनियंत्रण समितीने" घ्यावा. त्यानुसार मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवन व बॅरेक्स मध्ये महिला व पुरुषासाठी पर्याप्त स्वच्छतागृहांचे बांधकाम करणे, स्वच्छतागृहांचे आधुनिकीकरण करणे, स्वच्छतागृहांची देखभाल, मलनि:सारण व्यवस्था, घनकचऱ्याचे व्यवस्थापन इत्यादींसाठी प्रभावी उपाययोजना सुचवून त्यांच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण या समितीने करावे.

याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सार्वजनिक बांधकाम विभागाने अध्यक्ष, मंत्रालय स्वच्छता व्यवस्थापन व संनियंत्रण समिती यांचेमार्फत मुख्य सचिवांना सादर करावा.

८. सदर शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१२७८/इमा-३, दिनांक १८.७.२०११ नुसार मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 201108101237510 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रत्नाकर गायकवाड)
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उपसचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उपसचिव (स्वच्छतागृहे संबंधित), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उपसचिव (पापु-२१), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
११. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासन.
१२. निवडनस्ती, पापु २१

परिशिष्ट - अ

स्वच्छतागृहांसंदर्भात प्रश्नावली

इमारत- मंत्रालय (मुख्य)/मंत्रालय (विस्तार) / नवीन प्रशासकीय भवन /विस्तार

मजला -

ठिकाण-

| अ.क्र. | प्रश्न | होय | नाही | सूचना |
|---|---|---|---|---|
| १. | सर्वसाधारण स्वच्छता आहे किंवा नाही ? पाण्याचा अपव्यय टाळण्याच्या दृष्टीने water conserving नळ आहेत किंवा कसे | | | |
| २. | स्वच्छतागृहामध्ये पुरेसे पाणी आहे का ? | | | |
| ३. | दरदिवशी संपूर्ण स्वच्छता केली जाते का ? दिवसातून किती वेळा स्वच्छता केली जाते हे दर्शविणारा तक्ता स्वच्छतागृहात आहे का? तो दरदिवशी स्वाक्षरीत केला जातो का? | | | |
| ४. | Drainage System योग्य आहे किंवा कसे | | | |
| ५. | स्वच्छतागृहात पुरेशा प्रकाशासाठी लाईटस् आहेत का ? त्या चालु आहेत किंवा कसे ? त्यातून पुरेसा प्रकाश मिळतो का ? स्वच्छतागृहात पुरेशी खेळती हवा येते का? हवा उत्सर्जित करणारा पंखा (exhaust fan ) आहे का? | | | |
| ६. | पाण्याचा फ्लश चालु अवस्थेत आहे किंवा कसे. | | | |
| ७. | स्वच्छतागृहांच्या कडया व्यवस्थित आहे का ? | | | |
| ८. | स्वच्छतागृहातील wash basin व्यवस्थित आहेत का? | | | |
| ९. | स्वच्छतागृहांमध्ये आवश्यक ती सर्व साधने आहेत का ? १.मग २.बादली ३.लिक्विड सोप ४. बंद कचरापेटी ५. महिला स्वच्छतागृहात सॅनिटरी नॅपकीन टाकण्यासाठी स्वतंत्र बंद कचरापेटी | | | |

| अ.क्र. | प्रश्न | होय | नाही | सूचना |
|---|---|---|---|---|
| १०. | उशिरा थांबणाऱ्या महिलांसाठी महिला स्वच्छतागृहात सुरक्षा व्यवस्था ठेवण्यासाठी विशेष उपाययोजना | | | |
| ११. | स्वच्छतागृहात पाणी गळती आहे का? | | | |
| १२. | स्वच्छतागृहात राखवयाच्या स्वच्छतेबाबत सूचना , पाण्याचा अपव्यय टाळण्याबाबत सूचनासंदर्भातील ठळक अक्षरातील सूचनाफलक लावण्यात आलेला आहे का ? | | | |
| १३. | स्वच्छतागृहासंदर्भात तक्रारीची नोंद कोणाकडे करावी, त्याचे दुरध्वनीक्रमांक , ईमेल, online तक्रार नोंदविण्याची सुविधा इ.माहिती असलेला सूचना फलक आहे का? | | | |
| १४. | स्वच्छतागृहातील लाईट्स् तसेच पाणी पुरवठा सायंकाळी ५ च्या नंतर चालू असतो का? | | | |
| १५. | सुट्टीच्या दिवशी स्वच्छतागृहातील लाईटस् व पाणी पुरवठा चालू असतो का | | | |
| १६. | महिलांना स्वच्छतागृहात सुरक्षिततेच्या दृष्टीने प्रतिबंधात्मक उपाययोजना आहे का | | | |
| १७. | स्वच्छतागृहात इतर निदर्शनास आलेल्या ठळक आक्षेपार्ह बाबी | | | |

******